उप अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (गट-ब) या
संवर्गातील अधिकाऱ्याच्या मुदतपूर्व बदलीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक :- इएसटी-१२१८/प्र.क्र.१६१/राउशु-१,**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- ०६ सप्टेंबर, २०१८.

**शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या ४(५) मधील तरतुदीनुसार राज्य उत्पादन शुल्क विभागातील उप अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (गट-ब) या संवर्गातील खालील अधिकाऱ्याची, सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्व मान्यतेने विनंती / प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात येत असून, त्यांची पदस्थापना खालील स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे पद | नवीन पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. सुरजकुमार रामोड | बॉम्बे ब्रीवरीज, पनवेल, जि. रायगड | मुंबई उपनगरे क्र.२ |

२. बदलीचे हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या अधिकाऱ्यांने बदली नंतरच्या पदस्थापनेचा कार्यभार तात्काळ स्वीकारावा. बदली आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता आयुक्त, राउशु यांचे मार्फत खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

अ) बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर बदली झालेल्या अधिकाऱ्याला तात्काळ कार्यमुक्त करावे. बदली झालेले अधिकारी त्यांच्या सध्याच्या पदावरून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजू करून घ्यावे. सदर अधिकाऱ्याला रुजू करुन न घेतल्यामुळे काम न देता सक्तीचा प्रतिक्षाकाळ ठरवून वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधीत अधिकाऱ्यांना जबाबदार धरण्यात येईल.

ब) संबंधित अधिकाऱ्याला नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास त्वरीत कळवावे.

३. बदलीच्या आदेशात बदल करून घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधित अधिकाऱ्यांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९०६१४२९०५८८२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Punam Hiraman Wagde

Digitally signed by Punam Hiraman Wagde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=26d7295f0f289d96eecb9e12c2850ebd4f894edc0ea69760a3c1561515a6bf87, cn=Punam Hiraman Wagde
Date: 2018.09.06 14:30:28 +05'30'

**( पु.हि.वागदे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति:**

१) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३) संबंधित विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क (मार्फत आयुक्त, राउशु, मुंबई.)
४) संबंधित अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (मार्फत आयुक्त, राउशु, मुंबई.)
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६) निवासी लेखापरीक्षक, मुंबई.
७) संबंधित अधिकारी (मार्फत आयुक्त, राउशु, मुंबई.)
८) निवडनस्ती (राउशु-१).

**प्रत माहितीस्तव**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (राउशु) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.